नायब तहसिलदार संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

## शासन आदेश क्र.बदली-२०२४/प्र.क्र. २९/ई-९

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक:- १५ मार्च, २०२४

**संदर्भ :-** महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**शासन आदेश : -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकिय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार, नायब तहसिलदार संवर्गातील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्यांची लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ च्या अनुषंगाने / प्रशासकीय कारणास्तव त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नायब तहसिलदाराचे नाव व पदनाम | बदलीने करण्यात आलेली पदस्थापना |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | श्रीम. विजया भुजबळ, नायब तहसिलदार (निवडणूक), जिल्हाधिकारी कार्यालय पुणे, जि. पुणे | नायब तहसिलदार (राजशिष्टाचार शाखा), जिल्हाधिकारी कार्यालय पुणे, जि. पुणे (श्री. भंडारी यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| २ | श्री. रामचंद्र शणप्पा भंडारी, नायब तहसिलदार (राजशिष्टाचार शाखा), जिल्हाधिकारी कार्यालय पुणे, जि. पुणे | नायब तहसिलदार (निवडणूक), जिल्हाधिकारी कार्यालय पुणे, जि. पुणे (श्री. भुजबळ यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| ३ | श्री.रमेश वळवी, पुरवठा निरीक्षण अधिकारी, तहसिलद कार्यालय नंदुरबार, जि. नंदुरबार | नायब तहसिलदार (सामान्य शाखा) जिल्हाधिकारी कार्यालय नंदुरबार, जि. नंदुरबार |
| ४ | श्री.सचिन सुरेशचंद्र पोतदार, सहाय्यक कक्ष अधिकारी, राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक विभाग | नायब तहसिलदार (महसूल), तहसिल कार्यालय बागलान, जि. नाशिक |
| ५ | श्री. विक्रांत मोंढे, नायब तहसिलदार (साप्र), जिल्हाधिकारी कार्यालय जालना, जि. जालना | नायब तहसिलदार (आस्था), जिल्हाधिकारी कार्यालय जालना, जि. जालना |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येत असून, उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे.

३. संबंधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत संबंधित विभागीय आयुक्तांनी ई-मेलद्वारे/टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तेर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतुदीनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापुर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध शासन निर्णय, क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र. १८६/१६/का. १४, दि.२३.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार **शिस्तभंगविषयक कारवाई** करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम - ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने सदर अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्वीकारू नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते सदर अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

६. उपरोक्त आदेश सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत असल्याने पदस्थापनेच्या ठिकाणी परिविक्षाधीन तहसीलदार वा अन्य अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांच्या स्तरावरुन तात्पुरते व्यवस्थेने पदस्थापना दिलेली असल्यास अशा अधिकाऱ्यांना विभागीय आयुक्त यांनी अन्य रिक्त पदावर पदस्थापना द्यावी.

७. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ही गैरवर्तणूक समजून त्यांचे विरूद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२४०३१५२०१५३५४७१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SHRIKANT MADHUKAR MOHITE

Digitally signed by SHRIKANT MADHUKAR MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=5b514d2c3257bba976c5a2de42be8a635bba691c05d1f65ed0ead155a190e90e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F152866E6FC64E39CF88B9CB27AE0169A65B000039B269233C42B5B77F06B31, cn=SHRIKANT MADHUKAR MOHITE
Date: 2024.03.15 20:24:37 +05'30'

**( श्रीकांत म. मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

विभागीय आयुक्त, पुणे / नाशिक / छत्रपती संभाजीनगर विभाग.

प्रत,

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

२) मा. उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

३) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-३२

४) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.

५) अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२.

६) जिल्हाधिकारी, पुणे, नाशिक, नंदुरबार, जालना.

७) प्रधान महालेखापाल, (लेखापरीक्षा व लेखा अनुज्ञेयता) मुंबई .

८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नाशिक, नंदुरबार, जालना.

९) संबंधित आहरण व वितरण अधिकारी.

१०) सर्व संबंधीत अधिकारी (विभागीय आयुक्त, पुणे, नाशिक व छ. संभाजीनगर विभाग यांच्यामार्फत)

११) सह सचिव (ई-९) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२.

१२) निवडनस्ती, कार्यासन ई-९, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२